शस्त्रघायें ।।१७८।। स्वधर्मीं निष्ठा नसे ज्यासीं। कुंभीपाकादि शिक्षा त्यासीं। काचरसाचे कुंडापासीं। नेती त्या बुडवावया ।।१७९।। अग्निस्तंभां भेटवून। सवेचि करविती वृश्चिकदंशन। तीक्ष्ण शस्त्रें टाकिती छेदून। पुनर्जन्मां पाठविती ।।१८०।। पापपुण्य होतां समस्थिति। मनुष्यजन्मातें घालती। तेथें जरी स्वधर्मे वागती। नाहीं भीति यमाची त्या ।।१८१।। स्वधर्मीं पुण्य प्राण्यांस। विनयें भोगविती विलास। पुण्यक्षय झालिया नि:शेष। मृत्युलोकांस पाठविती ।।१८२।। ऐसी ही स्वधर्म-पुण्याची भीति। यमादिकां असे निश्चिती। पुण्यकर्माचा महिमा देव जाणती। वाखाणिती बहुसाल ।।१८३।। स्वधर्माचरणाचें यश। लाजवितसें शक्रास। म्हणोनि सांभाळावें तयास। स्वात्म-सुखालागीं ।।१८४।। माझे जे परम भक्त। त्याचे धर्मावर ग्रंथ। सूक्ष्म असती अत्यंत। गुरुगम्य ते ।।१८५।। जे मज आठविती रात्रंदिन। मज अर्चिती पंचाक्षरेंकरोन। ते मज प्रिय अनुदिन। लिंगधारी ।।१८६।। तया शिवभक्तां यम येत शरण। जे कां लिंगधारी करिती भस्मधारण। तैसेचि घालती रुद्राक्षाभरण। तें पावन ब्रह्मादिकां ।।१८७।। तेथें मी अहोरात्र वसे। भूतगणांसह परियेसे। अष्ट महासिद्धि सावकाशे। राबती तेथें ।।१८८।। न आवडे कैलासवास। कैलासीं मी असे उदास। भक्तगृहीं संतोषवश। डुलतसे आनंदें ।।१८९।। ऐसा सदाचारी तोचि जंगम। माझेंचि स्वरूप जाण सुगम। त्याविण मज नसें प्रेम। अन्या ठायीं ।।१९०।।

मद्देहं जंगमं देहं मत्प्राणश्चरलिंगकः। तस्माद्धिचरतीर्थेन मम तृप्तिर्वरानने ॥१७॥

**माझा देह तंव जंगमदेह। माझा प्राण तो जंगम आहे। पाहतां विचारें पाहे। पूज्यमान तो आम्हां ॥१९१॥ यालागीं चरणतीर्थ आम्हांसीं। सेवावया अधिकार नेमेसी। त्याचें तीर्थें तृप्ती आम्हांसीं। निजमानसीं वो देवी ॥१९२॥**

अनादिजंगमं देवि संपूज्य चरणोदकम्। अर्पयेत्परया भक्त्या ब्रह्माविष्णुसुरेश्वरान् ॥१८॥

**अनादिसिद्ध जंगममूर्ति। निराकार तारावया भक्तांप्रति। अवतरला सत्यशरण जाणती। सत्यशरणाला ॥१९३॥ त्याच्या चरणीचें तीर्थ। आम्हां तिन्ही देवांसीं अर्पित। करावया अधिकार नेमस्त। असे वो पार्वती ॥१९४॥ त्याचें चरण प्रक्षाळून। अष्टविधार्चनें कीजें पूजन। अंगुष्ठतीर्थाचें सेवन। आदरें कीजें ॥१९५॥**

अनादिजंगमो नित्यो निजैवास्य चराचरम्। चातुर्वर्णं भवेत् शिष्यं जंगमो गुरुरुच्यते ॥१९॥

**अनादिसिद्ध जंगम जाण। नित्य निर्गुण निरंजन। तो चातुर्वर्णासीं गुरु आपण। तारक जाणिजें ॥१९६॥ यालागीं तोचि गुरुराव। त्याची दीक्षा घेवोनि एकभाव। तो त्यजूनि करी अन्य गुरुदेव। तरी निरयासीं जाईजे ॥१९७॥ बहुलिंग बहुदैवतपूजन। बहुप्रसादी बहुगुरुसेवन। तयासीं दृष्टान्त जो देईन। तो ऐक वो**

देवी ।।१९८।। जैसा दासीकुसीं पुत्र झाला। तो आप्पा म्हणेल भलत्याला। ऐसा विचार घडला त्याला। ज्याला गुरु बहु होती ।।१९९।। एकनिष्ठा एकभावो। तोचि होय देवाधिदेवो। परि आधीच गुरुरावो। ज्ञानिया कीजें ।।२००।। जो असे ज्ञानांकित। जयाची संतमुखीं स्तुत। त्याची दीक्षा निभ्रांत। घेईजें विशेषें ।।२०१।। ऐसा जो गुरुरूप जंगम। मी तो जाण उत्तम। ज्याचे पूजेचा आम्हां नेम। तें विश्रामधाम आमुचें ।।२०२।। इति श्रीपरमरहस्यसारामृत। शिवगौरीसंवादीं वर्तत। त्याची टीका करोनि प्राकृत। कृतकृत्य मन्मथ ।।२०३।।

।। इति श्रीपरमरहस्ये हरगौरीसंवादे शरणलक्षणनिरूपणं नाम पंचदशोऽध्याय: संपूर्ण: ।।

श्लोक १९, ओव्या २०३.



# अध्याय सोळावा

॥ श्रीगुरवे नमः ॥

पंचदश अध्यायापर्यंत। कथिलें असें रहस्य अमित। ऐकोनि सद्गदित झालें चित्त। जगदंबेचें तें काळीं ॥१॥ ऐसा हा शिवधर्म उत्तम। भूतळीं कैसा आला परम। ये विषयीहि प्रश्न सप्रेम। करीतसे पार्वती ॥२॥

देव्युवाच-

धर्मस्यास्य महादेव महिमातिशयशालिनः। प्रादुर्भावो हि भूलोके कथं जातं श्रुणोमि तत् ॥१॥

ज्याच्या सेवेनें होती लोक पावन। ऐसा हा शिवधर्म परम गहन। भूमंडळीं कैसा झाला उत्पन्न। तें ऐकूं वाटें मज ॥३॥ या शिवाचार-धर्माची प्रसिद्धि। कवण्या आचार्यांनें केली वृद्धि। तयांचीं नांवें मज निवेदी। कृपा करोनि स्वामिया ॥४॥

शिव उवाच-

अतःपरं प्रवक्ष्यामि पंचाचार्यसमुद्भवः। तेषां नामानि स्थानानि सावधानमना श्रुणु ॥२॥

शंकर म्हणे अंबेप्रति। तुझा प्रश्न आचार्य-उत्पत्ति। शिवधर्म असे अनादिसिद्ध स्थिति। त्याची उत्पत्ति न वर्णवे ।।५।। प्रथम सांगेन आचार्य नाम। पुढें कथीन अवतार ग्राम। हा स्वायंभुवागमीं विस्तारक्रम। असे जाण पार्वती ।।६।। रेणुक दारुक एकोराम। पंडित विश्वाराध्य पंचम। या आचार्यांचा महिमा परम। वर्णूं शके कोण ।।७।। ऐसे पांची आचार्य शिवाचारमार्गीं। ते पांच झाले चहुयुगीं। त्यासीं आम्हांसीं भिन्नत्व जगीं। नुरेचि देवी ।।८।। तेविं ते महंत सत्यशरण। सातशें सत्तर गण। त्याज मजला भिन्नपण। सर्वथा नाहीं ।।९।। पांची आचार्य शिवाचारासीं मूळ। तयापासाव शिवाचार सकळ। वीरशैवमार्ग प्रबळ। विस्तार जाहला ।।१०।। तोचि मुळीचा शिवाचार। कल्याणीं अवतरला बसवेश्वर। त्यानेंहि केला विस्तार। शिवाचाराचा ।।११।। कोण्ही म्हणती शिवाचार नवा झाला। बसवेश्वरापासून विस्तारला। तें नेणोनि बोलती बोलां। अज्ञानपणें ।।१२।। जहींचा शिव तहींचा शिवाचार। नवा झाला म्हणती ते पामर। अनादि शिव तरी शिवाचार। अनादिसिद्धचि असे ।।१३।। शिव जरी होता युगानुयुगीं। तरी शिवाचार असेल कीं जगीं। जैचा शिव तैचा भक्तांगीं। शिवाचार अभंग असे ।।१४।। म्हणोनि अनादिसिद्ध। असे शिवाचार निबद्ध। नवा झाला म्हणती बुद्धिमंद। तें नेणोनि बोलती ।।१५।। मी अनादिसिद्ध शिवमूर्ति। शिवाचारहि अनादिसिद्ध पार्वती। यालागीं नूतन झाला जे म्हणती। ते मूर्ख

जाणावें ।।१६।।

यदा यदा प्राणशिवैक्यभाजां हानिर्भवेत् भूमितले गणेशः ।

तदा तदा भूमितलेऽवतीर्य कुर्वन्ति ते वै खलु धर्मसंस्थाम् ।।३।।

शंकर म्हणे अंबे ऐक। माझे पांच जे गणनायक। महापराक्रमी रेणुक। वीरशैव धर्ममूर्ति ।।१७।। तयाचे परी दारुक जाण। धर्मरक्षणाकारणें सुजाण। येती न लागतां एक क्षण। प्रतिसृष्टिकर्ते जे ।।१८।। ऐसे हे एकामागे एक। अवतरती गणनायक। वीरशैवधर्म प्रतिपालक। शिक्षा देत धर्म-भ्रष्टां ।।१९।। ज्या काळीं लिंगायतधर्म हानी। त्या काळीं सर्व धर्म लया जावोनि। अधर्म वाढे सतत मेदिनीं। धर्मविचार नसे कोणां ।।२०।। स्वधर्म सांडोनिया जाण। करिती अधर्म मंडण। तेणें पुण्यक्षय होऊन। अधर्मता प्राप्त होय ।।२१।। अधर्म जाहलिया सृष्टी। कदा नोहे पर्जन्यवृष्टी। तेव्हां कैलासीं येऊनि परमेष्टी। प्रार्थीतसे शिवालागीं ।।२२।। म्हणे अधर्म वाढला महिवरी। प्रजा सर्व जर्जर निरहारी। तयाचें संकट निवारी। कृपादृष्टीकरोनिया ।।२३।। तेव्हां शिव आज्ञा करी गणांसीं। तुम्ही त्वरें जावें मर्त्यलोकासीं। सर्व धर्म चालते ज्याचे त्यासीं। कीजें सत्य यावेळीं ।।२४।। वीरशैवधर्म परमपावन। तयाची वृद्धि करिता जाण। दुजे धर्म वाढावया कारण। हेंचि मुख्य साधन पैं ।।२५।। रेवणसिद्ध पूर्वदिशें। दक्षिणें मरुळसिद्ध असे।

पश्चिमदिशीं वसे। एकोराम ।।२६।। पंडिताराध्य उत्तरेसीं। विश्वाराध्य तो मध्यप्रदेशीं। शंकर निरोपी पार्वतीसीं। हे चहुयुगीं जाहले ।।२७।।

देव्युवाच-

भवदुक्त: शिवाचार: सम्यक्ज्ञातो मया प्रभो। अत:परं वद देव आचार्याणामनुक्रम: ।।४।।

पार्वती म्हणे शिवासीं। तुम्ही निरोपिलें शिवाचारासीं। ऐकोन संतोष झाला मानसीं। देवाधिदेवा ।।२८।। ऐसा शिवाचार जयापासोन। प्रबळला अतिगहन। ते आचार्य कोण कोण। त्याचीं नामें काई ।।२९।। ते कोण्या युगीं कोण अवतार। त्याचें कोण भूषण कोण आचार। कोण दिशा मुनीश्वर। मठ कोण कोण देशीं ।।३०।। इतुके निरोपा म्हणे पार्वती। ऐकोन सावध कैलासपति। तुझा प्रश्न बरवा म्हणती। निरोपुं आतां ।।३१।।

शिव उवाच-

गुरुर्रेवणसिद्धाख्य: सिद्धेशमरुळस्तथा। एकोराम: पंडितार्यो विश्वाराध्य इति क्रमात् ।।५।।

हे चहुयुगीं झाले आपण। रेवणसिद्ध मरुळसिद्ध दोन। तिसरा एकोराम महाप्रवीण। चौथा तो पंडिताराध्य ।।३२।। महाप्रतापी विश्वाराध्य। अखंड होवोनि राहिले निजबोध। निजचि ते स्वत:सिद्ध।

मुनीश्वर वो देवी ।।३३।। हे ते प्रत्यक्ष रुद्रचि असे। ज्ञानप्रकाशें भानु जैसे। जे परब्रह्म मुनिवेषें। अवतरले देख ।।३४।। चहुयुगीं पांची आचार्य। झाले असती गुरुवर्य। त्याची मठस्थिति कर्मकार्य। आघवे सांगो आतां ।।३५।। रेवणसिद्ध प्रसिद्ध गुरु। जेणें कथिला शास्त्राचारु। वीरशैवधर्माचा विस्तारु। सिद्धान्त दाखविला पैं ।।३६।। मरुळसिद्ध नामें साचार। प्रगटले माझे नामधार। तेणें केला उद्धार। भक्ति ज्ञान जाणे तो ।।३७।। एकोराम आणि पंडिताचार्य। हे तंव अवतारी भूवरीं गुरुवर्य। वीरशैवधर्माचें सर्व कार्य। जया आज्ञें घडतसें ।।३८।। विश्वाराध्य महागुरु। सर्वश्रेष्ठ अधिकारु। गुरुत्वाचा विचारु। प्रगट करी वेळोवेळीं ।।३९।।

प्रत्येकं च प्रवक्ष्यामि तेषां नामानि वै श्रुणु। अथ गोत्रं तथा सूत्रं प्रवराणि यथाक्रमम् ।।६।।

ही सांगितली संक्षिप्त कथा। आतां विस्तारें ऐक गोत्रगाथा। दंड कमंडलु सूत्र सर्वथा। निरोपितो वेगळाले ।।४०।।

सद्योजातमुखोत्पन्नो रेणुकः परिकीर्तितः। तन्नाम रेवणसिद्धः सूत्रं पडविडीत्यपि ।।७।।

जीं परशिवाचीं मुखें पांच। सद्योजात वामदेव अघोर साच। तत्पुरुष ईशान त्यांतच। उद्भवले आचार्यगण ।।४१।। सद्योजात पूर्वमुख। वामदेव दक्षिण देख। अघोर पश्चिम उत्तर तत्पुरुषमुख। ईशान

तें मध्य कीं ।।४२।। सद्योजात मुखापासाव। उद्भवला रेणुक गुरुराव। नामें रेवणसिद्ध देव। पडविडी सूत्रकर्ता ।।४३।।

गुरोः रेवणसिद्धस्य कोल्लिपाकपुरोत्तमे। सोमेशलिंगजननमावासः कदलीपुरे ।।८।।

वीरधर्मप्रतिपालक प्रसिद्ध। नामें श्रीगुरु रेवणसिद्ध। कोल्लिपाक नगराभीतरीं शुद्ध। सोमेशलिंगीं उद्भवले ।।४४।। तेथून निघाले सत्वर वनां। गुरुत्व अधिकाराचें ज्ञानां। उपदेशावया मुनिजनां। वास केला आश्रमीं ।।४५।। तेथें आपुलें सिंहासन। रंभापुरी येथें स्थापून। वीरशैवधर्मा प्रगटवोन। शिक्षा करी धर्मभ्रष्टां ।।४६।। ऐसा कृतयुगीं रेवणसिद्ध। तो केवळ निबद्ध। षोडश मुद्रिका शोभला प्रसिद्ध। महंत तो ।।४७।। तो चिद्रूप चिदाकार। साकारत्वेंचि निराकार। जैसी मेघमुखीची गार। पुनः विरे तत्क्षणीं ।।४८।। शिवाचार अनादिसिद्ध। तोचि प्रकाशावया प्रसिद्ध। अवतरला रेवणसिद्ध। आदिगुरु शिवाचारासीं ।।४९।। त्यासी सर्वांगीं विभूतिभूषण। मस्तकीं जटामुकुट शोभायमान। कंठीं हिरवी कंथा परिधान। मुनीश्वरासीं ।।५०।।

अतिवर्णश्च वर्णः स्यात् प्रवरेकाक्षरो मतः। दण्डोऽश्वत्थ इति प्रोक्तः सौवर्णस्य कमंडलुः ।।९।।

सौवर्णः कलशस्तस्य व्याघ्राजिनांबरस्तथा। तस्य कंथा हरिद्वर्णा लक्षणं वीरगोत्रिणाम् ।।१०।।

करीं सुवर्णाची खापरी। व्याघ्राजिन खांद्यावरी। घेवोनि कमंडलु करीं। योगमुद्रा सदा ।।५१।। मस्तकीं सुवर्णाचे लिंग। पादुका चरणीं चांग। चंदन सुगंध सर्वांग। तयातळीं वास त्याचा ।।५२।। ऋग्वेदाचें उच्चारण करी। बैसे तरी वज्रासनावरी। चंद्रमौळेश्वराचें करी। अखंड ध्यान ।।५३।। तयासी सिंहाचें वाहन। इच्छाशक्तीनें वर्तन। दर्शनस्पर्शनें जीव शिवपण। तात्काळ देतुसे ।।५४।। ऐसा तो महासिद्ध। पूर्वदिशीं असे प्रसिद्ध। शिवाचारासीं अग्रगण्य निबद्ध। रेवणसिद्ध तो ।।५५।।

तद्वन्मरुळसिद्धस्य वटक्षेत्रे महत्तरे। सिद्धेशलिंगे जननं स्थानमुज्जयिनीपुरे ।।११।।

तैसेचि वटक्षेत्रीं अवतार होतां। चरणीं पावन झाली क्षिप्रा माता। उद्भव सिद्धेशलिंगीं तत्त्वतां। सिंहासन उज्जयिनी पुरी ।।५६।। ते मरुळाचार्य विख्यात। शिवादेशें करोनि मर्त्यलोकांत। वीरशैवधर्मा संरक्षित। महाज्ञानी जाण तो ।।५७।। त्याचा दक्षिण दिशीं मठ असतु। मरुळसिद्ध महामहंतु। ज्ञानसूर्य जैसा भासतु। चिद्गगनीचा ।।५८।। निर्विकल्प दशें असत। तया पिशाचवृत्ति आवडत। मन उन्मनीं सदोदित। संतुष्ट सदा ।।५९।। तो कोणाचे आश्रमां न जाय। कोणाचें शास्त्रां न पाहे। कोणाचे संगीं न राहे। क्षणभरी तो ।।६०।। कपिलेश्वराचें करी ध्यान। यजुर्वेदाचें उच्चारण। गोमेद लिंगाचें पूजन। वटाचे वृक्षीं वास करी ।।६१।।

वामदेवमुखोत्पन्नो दारुक: परिकीर्तित: । तन्नाम मरुळाराध्य: सूत्रं तस्य तु वृष्टिकम् ।।१२।।

**वामदेवमुखापासून । झाले दारुकार्य उत्पन्न । वृष्टी सूत्राधिकारी पूर्ण । नामें मरुळाराध्य प्रसिद्ध ।।६२।।**

तस्य दण्डश्च पालाशो तथा ताम्रकमंडलु: । मकारो बीजमंत्रश्च शाखा दारुक ईरिता ।।१३।।

कलशस्तस्य ताम्रश्च मृगाजिनविभूषण: । तस्य कंथा च मांजिष्ठा लक्षणं नंदिगोत्रिणाम् ।।१४।।

**अमलाक्ष लिंग अवधारी । मृगाजिन खांद्यावरी । समीप तांब्याची खापरी । तया सत्यशरणासीं ।।६३।। रुद्राक्षमाळा कंठीं शोभती । व्याघ्र वाहन तयाप्रति । जप मयूरासनीं करिती । मरुळसिद्ध ते ।।६४।। क्रिया-ज्ञानशक्ति धरोन । भूचरी मुद्रा गुरूचें ध्यान । नेत्रवेधी ऐसी सिद्धि जाण । तयापासीं असे ।।६५।। मकार अक्षरीं समाधि । चर्चिली विभूति ब्रह्मावबोधी । मस्तकीं जटा योगसिद्धि । चरणां लागती तयाच्या ।।६६।। पळसाचा दंड हातीं । ताम्र कलशाची दिव्य दीप्ती । कंथा आरक्त स्थिति । असे जया गुरुवर्या ।।६७।। ऐसीं मरुळसिद्ध मुनीचीं । भूषणें निरोपिली तयाचीं । निराश निरभिमान अविद्येची । वार्ता तेहि तेथ नाहीं ।।६८।। अखंड निमग्नत्व असें । आनंदें डुल्लतु पिशाचदशें । भाग्योदयें जया भेटतसे । तया आपणाऐसे करी ।।६९।। तो जरी अदृष्टें पाहे कोणाकडे । तरी त्यास ब्रह्मांडभांडार उघडे । तात्काळ वस्तु होवोनि भिडे । वस्तुचि माजीं ।।७०।। गंगा सागरां शरण गेली । ती मिळोनि सागरुचि झाली ।**

परतोनि नाहीं आली। ठेली सागरुचि ।।७१।। तेविं जे संतां शरण गेले। ते मिळणीं तद्रूपचि झाले। पुन: नरदेहां नाहीं आले। होवोनि ठेले परब्रह्म ।।७२।। म्हणोनि महंत मरुळसिद्ध। शरणागतां करी ब्रह्मबोध। शिवाचारासीं प्रसिद्ध। तारक कृपाळु ।।७३।।

एकोरामस्य जननं द्राक्षारामे प्रकीर्तितम्। रामनाथमहालिंगे तद्वासस्तु हिमालये ।।१५।।

आतां तिसरा आचार्य एकोराम। तो ज्ञानभानु परब्रह्म। निरक्षर निरामय नि:सीम। निष्काम तो ।।७४।। द्राक्षाराम क्षेत्र प्रसिद्ध। तेथें रामनाथलिंग असे सिद्ध। तेथ उद्भवला सुबुद्ध। एकोरामाराध्य तो ।।७५।। हिमालयीं क्षेत्र केदार। उषामठ असे अतिसुंदर। तेथें वास करी निरंतर। आचार्यगुरु ।।७६।। तो आचारासीं तरी अग्रगण। शिवाचारासीं तो संपन्न। जयासीं वंदिती वीरशैव गण। सातशें सत्तरी ।।७७।। बसवादि प्रमथ सकळ। नमिती जयाचें चरणकमळ। तो एकोराम आचारशील। शिवाचारी मुख्य ।।७८।।

मदघोरमुखोत्पन्न: शंकुकर्णेति नामत:। एकोरामेति तन्नाम तस्य सूत्रं तु लंबकम् ।।१६।।

ब्रह्मो दण्डस्तथा लोहकलशश्च कमंडलु:। नीलकंथा तथाऽवास: पारिजाततरोरध: ।।१७।।

शिव म्हणे गिरिजासुंदरी। अघोरमुखाभीतरीं। शंकुकर्ण ते अवधारी। आचार्यवर अवतरले ।।७९।। तयाचें नांव एकोराम। सर्व जीवाचें विश्रामधाम। लंबक सूत्राधिकारी परम। गोत्र भृंगी जयाचें ।।८०।।

तो शिवाचा अवतार। मुखीं सामवेदाचा उच्चार। मणिमय लिंग निरंतर। पुजीतसे ।।८१।। तो द्वापरीं अवतरला। वैराग्यपीठिका मिळे त्याला। पश्चिमदिशीं मठ शोभला। वेणुदंड करीं धरी ।।८२।। सदा महेश्वरध्यानीं असत। पारिजातकीं वास निभ्रांत। बैसका गरुडासनीं शोभत। तया महासिद्धासीं ।।८३।। मस्तकीं जटा पांच शोभत। सर्वांगीं विभूति उधळत। श्रवणीं कुंडलें ढाळ देत। भानुप्रभा जैसी ।।८४।। लिंगमुद्रा कंठीं तत्त्वतां। रत्नकंबळाची मिरवे कंथा। रुद्राक्षमाळा पवित्रता। हृदयावरी शोभती ।।८५।। मंत्रशक्ति वसे जिव्हाग्रीं। नासाग्रीं ध्यान तो धरी। लोहखापरी धारण करी। कलश तोहि लोहमय ।।८६।।

शिकारो बीजमंत्रश्च अतिवर्णाश्रमे रतः। शाखा शंकुकर्णाख्या लक्षणं भृंगिगोत्रिणाम् ।।१८।।

शिकार मंत्र बीजाक्षर। अखंड ध्यानीं निरंतर। सदा तन्मय मुनीश्वर। एकोराम तो ।।८७।। अतिवर्णाश्रमीं वर्तत। शाखा शंकुकर्ण विख्यात। सामवेद विभागीं असत। तेचि उपदेशी स्वशिष्यां ।।८८।। अमृतसंजीवनीचें असे ध्यान। तयासीं गजाचें वाहन। शिवाचारीं असे संपन्न। महामहंत तो ।।८९।। सत्य तेंचि बोलणें। निःसंग निराश असणें। परि पंचक्रियेनें वर्तणें। काम नाहीं अंतरीं ।।९०।। ऐसा तो महामहंतु। शिवाचारयुक्त समर्थु। जयाच्या सत्तेनें चालतु। शिवाचार रत्न ।।९१।।

सुधाकुण्डाख्यसुक्षेत्रे लिंगे श्रीमल्लिकार्जुने। जननं पण्डितार्यस्य निवासः श्रीगिरौ शिवे ।।१९।।

सुधाकुंड नाम क्षेत्रीं जाण। मल्लिकार्जुन महालिंगांतून। प्रगटले आचार्य पूर्ण। पंडितार्य गुरुवर ।।९२।। निवास केला तो अति निर्मळ। गिरिराज राज तो श्रीशैल। तयाचिया दर्शनें कलिमल। नष्ट होती सर्वथा ।।९३।।

तत्पुरुषमुखोत्पन्नो धेनुकर्णेति नामतः। तन्नाम पंडिताराध्यो मुक्तागुच्छं तु सूत्रकम् ।।२०।।

तत्पुरुष मुखापासून। धेनुकर्ण आचार्य उत्पन्न। शिवागमींची गूढ खूण। तुज निरोपिली वो देवी ।।९४।। तो चौथा आचार्य महासिद्ध। जो शुद्ध स्वानुभवी स्वतःसिद्ध। नामें पावन प्रसिद्ध। पंडिताराध्य स्वामी ।।९५।। मुक्तागुच्छ सूत्राचा अधिपति। महामुनी जयां वंदिती। उपसूत्रें द्वादश असती। तया आचार्यां जाणावें ।।९६।।

सूर्यसिंहासनाधीशो दण्डो वंशमयः शुभः। रजतः कलशः प्रोक्तः तथैव च कमंडलुः ।।२१।।

उत्तरदिशीं सूर्यपीठीं मठ। वास तरी वंशवृक्षीं सुभट। भोगलिंग तंव वरिष्ठ। सर्व लिंगांमाजीं ।।९७।। आचार्य तो तारक अवतार। स्वानुभवी ज्ञानभास्कर। शिवाचार तारावया कलीभीतर। उदय झाला आराध्यभानु ।।९८।। तो तद्रूप सदाशिव। शिवाचारां निःसंदेह देव। संदेह कल्पना सर्व वाव। केवळ चिद्रूप तो ।।९९।। भोगेश्वराचें ध्यान करी। करी रुप्याची खापरी। आरूढे हंसवाहनावरी। आराध्य

तो ।।१००।। कंदमूलाचा प्रसाद करी। प्राक्तनानुसार अन्न स्वीकारी। अखंड ध्यान अंतरीं। गुरुलिंगाचें।।१०१।।

वकारो मंत्रबीजं च श्रुतिराथर्वणी शुभाः। श्वेतकंथा तु संप्रोक्ता लक्षणं वृषभगोत्रिणाम्।।२२।।

वकार बीज महातेजाळ। जैसा सहस्र विजूंचा मेळ। तो जपत असे सर्वकाळ। रावो सकळ सिद्धांचा।।१०२।। अथर्वण वेद उच्चारण। हृदयीं शिवलिंगधारण। कंथेलागीं पट्टवस्त्र पूर्ण। शोभलें शुभ्र।।१०३।। ऐसा कलियुगीं अवतार। पंडिताराध्य महामुनीश्वर। तेणें वाढविला शिवाचार। शिवभक्त तो।।१०४।। तया शिवावांचून दुसरे। आन देवोदेवी नसे साचारे। गुरुलिंगजंगमीं ऐक्यविचारें। वर्ते सदाचारी।।१०५।। शिवमुद्रा अलंकृत भूषण। शोभे जैसा प्रकाशला भान। भक्तिसुखास्तव निर्गुण। तो सगुण होवोनि अव-तरला।।१०६।। मस्तकीं जटा शोभती। सर्वांगीं मिरवे विभूति। कर्णीं कुंडलें ढाळ देती। निजतेजाकार।।१०७।। गुरुलिंगजंगम भजन। सांगे सकळां एक विधान। आसनीं श्वेत कंबळासन। पद्मासनीं बैसका तया।।१०८।। गुरु-लिंग-जंगम एकभावना। अभेदभावें धरी ध्याना। परकायप्रवेश याहि खुणा। जाणतु असे तो।।१०९।। परकायप्रवेश हें नवल काय। अष्ट महासिद्धि वंदिती पाय। चाऱ्ही मुक्ति आलिया न पाहे। मुक्तीचा साक्ष म्हणोनि।।११०।। शिवाचारी शिव-

**भक्त। दीक्षा देवोनि तारिले बहुत। पंचकलश नेमस्त। स्थापोनिया।।१११।। दीक्षावंत गुरुकरजात। करोनिया शुद्ध शिवभक्त। ऐक्य दावोनि गुरु-लिंग-जंगमांत। तीर्थप्रसाद सेवविती।।११२।। ऐसा शिवागमीं विचार। तो विस्तारला अपार। कल्याणीं अवतरला बसवेश्वर। शिवाचार-संपन्न।।११३।।**

काश्यां विश्वेश्वरे लिंगे विश्वाराध्यस्य संभवः। स्थानं श्रीकाशिकाक्षेत्रे श्रुणु पार्वति सादरम्।।२३।।

**विश्वाराध्य विश्वगुरु। काशीक्षेत्र पीठाचारु। धरी विश्वेशलिंगीं अवतारु। अज्ञ जनाकारणें।।११४।।**

ईशानाख्यमुखोत्पन्नो विश्वकर्णेति विश्रुतः। विश्वाराध्यस्तु तन्नाम सूत्रं स्यात् पंचवर्णकम्।।२४।।

**माझें ईशानमुखापासोन। विश्वकर्णाचा अवतार जाण। विश्वाराध्य नाम पूर्ण। समर्थ गुरु।।११५।। तयाचें सूत्र पंचवर्ण। पांचवा शिवगण अभिन्न। वीरशैव प्रवरोत्पन्न। असे जाण विश्वार्य तो।।११६।।**

दण्डो बिल्वजः प्रोक्तः सुवर्णस्य कमंडलुः। कलशस्तस्य सौवर्णः आसनं स्वर्णकंबलम्।।२५।।

ज्ञानसिंहासनं दिव्यं मंत्रबीजं यकारकम्। कंथाऽपि पीतवर्णास्याल्लक्षणं स्कंदगोत्रिणाम्।।२६।।

**हा पांचवा आचार्य सुजाण। ऐके याचें स्वरूपगुण। दिशेमध्यें ऊर्ध्व जाण। श्रेष्ठ महिमान असें त्याचें।।११७।। बिल्ववृक्षातळीं साचार। तोचि दंड धारण करी निरंतर। खापरी करी सादर। सोनियाची।।११८।। कंथा तीहि स्वर्णकंबळ। व्याघ्रांबर धारण केलें तेजाळ। सुवर्ण सुखासन विशाळ।**

वाहनीं असे ।।११९।। ज्ञानपीठीं जंगममठ। सर्व ज्ञानियांतें वरिष्ठ। उपदेशी शिवतत्त्व श्रेष्ठ। विश्वगुरु तो ।।१२०।। स्वच्छंदें वर्ते गुरुराज। जग तारावया निर्व्याज। मुनिरूप धरोनि सहज। शिवचि आला ।।१२१।। पूजन करी विश्वेश्वराचें। ध्यानीं मनीं तोचि नाचे। यकार अक्षर बीजाचे। उच्चारी मुखें ।।१२२।। चिन्मय तो गुरुमूर्ति। तुर्यातीत आहे वस्ती। तेंचि उपदेशी सहजस्थिति। परमहंस योगियां ।।१२३।। मस्तकीं शोभे जटामुकुट। हृदयावरी रुद्राक्षमाळा वरिष्ठ। भस्मोद्धूळित देह सुभट। तेजें जैसा गभस्ति ।।१२४।। आनंदवनीं असे वास। तोहि सदा आनंदमय सावकाश। शिवानंदामृतरस। श्रोतृद्वारें ओपी भक्तातें ।।१२५।। ईश्वर म्हणे पार्वतीप्रति। हे आचार्य अवतरले भूवरती। सूत्रें प्रगटली पूर्ण स्थिति। वीरशैवाकारणें ।।१२६।। ऐसी पंचाचार्यांचीं स्थानें। तुज निरोपिलीं वरानने। माहेश्वराची मूळ स्थानें। असती जाण पांच ती ।।१२७।। पांच आचार्य पांच मठ। हें कथिलें गुह्य स्पष्ट। जे वीरशैव शिवाचारनिष्ठ। ते हे जाणती खूण ।।१२८।। चहुयुगीं आचार्य जाहले। जनां शिवभक्तीसी लाविले। सातशें सत्तर गणीं निवडले। शिवाचार-मार्गीं ।।१२९।। बसवादि प्रमथगण। सातशें सत्तर असती नेमून। एऱ्हवीं असती जाणे कोण। गणांची संख्या ।।१३०।। शिवगण रुद्रगण अमरगण। शिवागमीं वर्णिले असंख्य जाण। गण गणितां वेद श्रुति पुराण। मौन धरोनि राहिले ।।१३१।। मा मी काय वर्णूं

महिमा तयाची। अगाध महिमा शक्ति खुंटली वाचेची। अनंत कोटी गणना गणांची। तेथ मी काय वर्णूं।।१३२।। एका चौकडियाचे गण। गणित केलें गणून। परि अनंत चौकडियांचे जाले ते कवण। गणीतसे।।१३३।। कृत त्रेता युग द्वापर। कलियुगासहित युगें चार। या चहुयुगांची चौकडी साचार। एक जाहली।।१३४।। ऐशा चौकड्या एक सहस्र होती। तंव अस्तमानां जाय गभस्ति। तैशा चौकड्या एक सहस्र होती। तंव एक दिवस होय ब्रह्मीयाचा।।१३५।। ऐसे तीस दिवस जाती। एक मास होय विधात्याप्रति। ऐसे द्वादश मास होती। तंव होय एक वरुष।।१३६।। ऐसें वरुषें जाती एक शत। तंव ब्रह्मीयास होय अंत। त्याच्या आयुष्याचें सरें गणित। तंव घटिका विष्णूची।।१३७।। ऐसिया घटिका साठ जाती। तंव एक दिवस विष्णूप्रति। ते हे तीस दिवस जाती। तैं एक मास विष्णूचा।।१३८।। ऐसे मास द्वादश होती। तरी एक वरुष होय विष्णूप्रति। ऐसें वरुषें शत जाती। तदा विष्णु एक पडे।।१३९।। ऐसे द्वादश विष्णु जाती। तंव अर्धपळ होय रुद्राप्रति। त्या रुद्राचे गण सांगावे किती। कोणी गणना करोनि।।१४०।। अनंत युगांचे महारुद्र। गणहि अनंत युगांचे अपार। जैसा देव तैसे भक्त साचार। जेविं देहीं आत्मा असे।।१४१।। ऐसे युगायुगीचे गण। सांगे ऐसा आहे कोण। म्हणोनि संक्षेपें याचें प्रमाण। सातशें सत्तर निरोपिलें।।१४२।। यावेगळे सप्तकोटी। ते असती कैलासकपाटीं। विचित्ररूपें

विकटी। बहुविध तयांची ।।१४३।। एव्हवीं असंख्यात गण। नाम घेतां उरे कोण। ते माझे पूज्यमान। मज पुजिती ते।।१४४।। ते मज पूज्य मी पुजी तयासीं। अणुमात्र भेद नाहीं तया मजसीं। म्हणोनि पुजिजें सद्भावेसीं। तरी ते मीच होय।।१४५।। शिव आणि शिवगण। कदापि भिन्न नोहे जाण। शिवाचारविचारी संपन्न। शिवगण सावध सदा।।१४६।। ऐसी शिवाचारदीक्षा जाण। पंचाचार्य करिती संपन्न। शिवाचारातें स्थापून। जनां भक्ति लाविती ।।१४७।। इति श्रीपरमरहस्यसारामृत। शिवगौरीसंवादीं वर्तत। त्याची टीका करोनि प्राकृत। कृतकृत्य मन्मथ ।।१४८।।

।। इति श्री परमरहस्ये शिवगौरीसंवादे आचार्यावतारमठलक्षणादि कथनं नाम षोडशोऽध्यायः ।।

श्लोक २६, ओव्या १४८.



# अध्याय सतरावा

॥ श्रीगुरुवे नमः ॥

श्रीपरमरहस्य ग्रंथ सुंदर। वीरशैवधर्माचें तत्त्वमंदिर। चतुर्दश भुवनें आणि त्रिलोक परिकर। नांदती जयामाजीं ॥१॥ कीं मूळ मातृका षोडश। पूर्ण झाल्या येथवर विशेष। अनक्षरा मातृका सावकाश। निरोपुं आतां ॥२॥ शिवचंद्राच्या ह्या सोळा कळा। भवदुःखतप्त जीवां निववितो सकळां। ही सतरावी जीवनकळा। अक्षय असे निश्चयें ॥३॥ येथीचें जें ज्ञान। सर्व सुखांसीं असें कारण। म्हणोनि ठेवावें चित्त पूर्ण। श्रवणाठायीं ॥४॥ श्रवण-मनन-निजध्यासें। साक्षात् वस्तु भेटे विश्वासें। नातरी व्यर्थ आयासें। कां शिणवावें जीवातें ॥५॥ असो आतां येथ विशेष विस्तार। करणें नलगे मजला फार। वीर श्रोते परम चतुर। तरी सुचनार्थी बोलिलो ॥६॥ पुनः प्रश्न करी जगदंबा। सच्चिद्रूप शिवसांबा। शिवसंस्कार मूळस्तंभा। पुसेल ती ॥७॥

देव्युवाच-

भगवन् सर्वदेवेश रहस्यं परमं श्रुतम्। श्रोतुमीहे वीरशैवसंस्काराणामनुक्रमः ॥१॥

जन्माद्यंतेष्टीपर्यंत। वीरशैव संस्कार समस्त। ऐकूं म्हणे विश्वस्त। गिरिजा देवी शंकरासीं ।।८।। मूल संस्कार षोडश। त्यामाजीं असती मुख्य दश। त्यांहिमाजीं बहु विशेष। शिवदीक्षा जाणावी ।।९।। जगदंबा म्हणे सदाशिवा। माझिया प्रश्नाते देवाधिदेवा। अनुलक्षोनि देआवा। उपदेश मज ।।१०।।

शिव उवाच-

श्रुणु देवि प्रवक्ष्यामि संस्काराणामनुक्रमः। एतत् श्रुत्वा च कृत्वा च लभेत्सा भक्तिरुत्तमा ।।२।।

शिव म्हणे अंबेप्रति। तुझ्या प्रश्नें जडजीव उद्धरती। तेंचि मी तुजप्रति। सांगेन आतां ।।११।। गर्भाधानापासून आघवे। संस्कार सोळा जाणावें। सांगेन आतां त्यांचीं नांवे। त्यांत मुख्य दहाचि ।।१२।।

गर्भाधानं पुंसवनं सीमंतं जातकर्म च। तन्नामकरणं चापि बहिर्निष्क्रमणं तथा ।।३।।

चौलकर्म तथैवोक्तं वेदारंभो हि युक्तितः। शिवदीक्षाविवाहश्च संस्कारा दशमुख्यकाः ।।४।।

गर्भाधान म्हणिजे ओटीभरण। तो पहिला संस्कार जाण। पिंड-उत्पत्तीस मूळ कारण। हेंचि असे ।।१३।। पुंसवन संस्कार दुसरा। डोहाळे सीमंत म्हणती तिसरा। चौथियाचा असे उजियारा। जातकर्म म्हणोनि ।।१४।। नामकरण पांचवा। बहिर्निष्क्रमण सहावा। चौलकर्म म्हणती सातवा। करावा संस्कार हा ।।१५।। वेदारंभ आठवा संस्कार। बटूसीं करणें असे अनिवार। तयाविण ज्ञानप्रसार। होईल केविं ।।१६।।

नववा संस्कार शिवदीक्षा। अत्यावश्यक असे वीरशैवपक्षां। त्याविण संतोष विरूपाक्षा। न होयचि सर्वथा।।१७।। दीक्षा हा जातिसंस्कार। वीरशैवाचा मुख्य कुलाचार। त्याविण वर्ते जो पामर। भवि जाणावा निश्चयें।।१८।। शिवदीक्षेचीं लक्षणें। कथिती श्रुति-आगम-पुराणें। सालसें निरोपीन तुजकारणें। शैलात्मजे सुंदरी।।१९।।

दीयते ज्ञानसंबंध: क्षीयते पाशबंधनम्। दानक्षपणसंयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता।।५।।

निर्मल शिवैक्य ज्ञानेकुन। ज्या संस्कारें तुटे आशापाशबंधन। म्हणोनि दीक्षा म्हणती त्यालागून। दान क्षपण भावयोगें।।२०।। ती दीक्षा असे त्रिविध। अंतरात्मा करावया शुद्ध। त्याचीं नांवें विविध। शास्त्रांतरीं पाहावी।।२१।।

गर्भाष्टमे कृता दीक्षा मुख्या सा षोडशावधि:। गौणी तदूर्ध्वमधमा वीरशैवान्वयायिनाम्।।६।।

गर्भापासून आठवें वरुष। मुख्य दीक्षाकाल विशेष। मध्यम जाण वरुष षोडश। तयापुढें गौण तें।।२२।। जन्म झाल्यापासून। देहस्थ लिंगाची आठवण। तीच सुदृढ परिपूर्ण। येणें संस्कारें होये।।२३।। दीक्षेलागीं आचार्य आवाहन। प्रथम करावें जाण। अग्रासनीं बैसवोन। पूजा करावी भक्तिबळें।।२४।। ते आचार्य म्हणसी कोण। तयाची सांगेन मी निजखूण। ऐक तूं सावध होवोन। स्नेहभरें पार्वती।।२५।।

षोडश अध्यायीं वर्णिले शिवगण। सातशें सत्तर असती नेमून। ते शिवाचारमार्गीं निपुण। रत असती एकनिष्ठें ।।२६।। तया सकळ गणांमधीं। हे पांच आचार्य जाणते सुबुद्धि। तया पांचाविण दीक्षासिद्धि। करूं नये महामंत्रीं ।।२७।। तेहिं चालविला शिवाचार। भूमंडळीं घेवोनि अवतार। हेचि असती मुख्य आधार। वीरशैवाकारणें ।।२८।। त्याचे साक्षित्वाचे जे कलश। तीच त्याची प्रतिमा जाणिजेस। ते आचार्यचि असती हा विश्वास। धरिजे शिवगणीं ।।२९।। चौघांचे चहु कलश जाणिजें। मध्यें श्रीगुरुरायाचा बोलिजें। ऐसी पंचकलश दीक्षा घेईजें। तंव गुरुकरजात जाहला ।।३०।। जंववरी पंचकलश दीक्षा नाहीं। तंववरी भविच बोलिजें पाही। तया शिवभक्ताचे ठायीं। लेखूं नये सर्वथा ।।३१।। तयासीं तीर्थप्रसाद तत्त्वतां। देऊं नये वो सर्वथा। आचार्यसाक्षीं दीक्षा नसतां। अनधिकारी तीर्थासीं ।।३२।। जंववरी तीर्थप्रसाद नाहीं। तंववरी शिवभक्त नोहे पाही। कंठीचा लिंग तोहि। पाषाण जाणिजें ।।३३।। कां म्हणसी तरी ऐक। तीर्थप्रसाद तें लिंगाचें जीवन सम्यक्। तेणेंविण लिंग निर्जीव देख। न मिळता तयासीं ।।३४।। कोणी म्हणती जईं लिंग बांधिलें। तईंच तीर्थप्रसाद अर्पिलें। आतां प्रतिदिनीं अर्पावया काय घेतलें। लिंगाचें आम्ही ।।३५।। त्यासीं दृष्टान्त असे एक। लक्ष देवोन ऐक सम्यक्। मग हा निमेल कुतर्क। मनाचा निश्चयें ।।३६।। जईं वृक्ष उपवनीं लाविले। तईंच तया उदक घातिलें। आतां काय तया

वृक्षाचे घेतले। उदक घालावया।।३७।। मनीं ऐसा विचार करोन। वृक्षां उदक न देतां जरी राहे उदासीन। तरी तया वृक्षाचें जीवन केविं वाढेल अनुदिन। याचा विवेक करावा।।३८।। तो वृक्ष कैसा फळेल। कैसे अमृतफळ देईल। मग कैंची सुखसंपदा होईल। न देतां उदक वृक्षां।।३९।। तेविं लिंगासीं तीर्थप्रसाद। न देतां होईल कैसा सुखानंद। न फळेचि शिवसुखबोध। क्रियाभ्रष्ट म्हणोनि।।४०।। आणिक एक कवतुक। गुरु लिंग जंगम तिन्ही एक। तरी श्रीगुरु तोचि लिंग देख। साक्षत्वें जालें कीं।।४१।। तरी लिंगां जें जें सुख देईजें। जें जें पत्र पुष्प वाहिजें। तें तें गुरूसीं अर्पण सहजें। कां आनाठायां जात।।४२।। तें गुरूसींच अर्पे जाणोन। मग तीर्थप्रसादीं कां न करावा यत्न। प्रयत्नेंकरोनि जरी करी अर्पण। तरी श्रीगुरु संतोषे।।४३।। म्हणोनि तीर्थप्रसादीं असावा नेम। नित्यनूतन धरावा प्रेम। परि आधी गुरु करावा हें वर्म। तेथेंचि जाणिजें।।४४।। एऱ्हवीं घरोघरीं गुरु असती। स्वार्थार्थें बोधिती शिष्यांप्रति। परि स्वानुभवें तद्रूप करिती। त्या नांव सद्गुरु वो देवी।।४५।। स्वार्थी जे कां असती गुरु। ते न होती भवसागर तारु। बोधिती अनेक मतांतरु। नानाविध।।४६।। हे गुरु नाना मतें दाविती। एक ते तीर्थाटनां धाडिती। एक ते पाषाण पुजविती। नाना दैवतें।।४७।। एक ते तपां धाडिती। एक ते करकमळीं घालविती। एक ते धूम्रपान साधविती। पंचाग्निताप एक।।४८।। एक लौकिक कर्मे करविती। एक ते वायूसीं झुंझावे घेवविती।

एक ते आसनीं बैसविती। म्हणती कीं उठोचि नको ।।४९।। एक ते मौन धरविती। एक ते नागवेचि पळविती। एक ते बळें सांडविती। स्त्रीबालक मातांपितां ।।५०।। एक ते अन्न त्यागविती। एक ते कंदमुळे भक्षविती। एक ते कपाटीं बैसविती। एक ते ऊर्ध्वबाहू ।।५१।। एक ते जटा वाढविती। एक ते बोडकेचि ठेविती। एक केश लुंच्छविती। नेणती कर्म पशुसम ।।५२।। एक ते अजपांत गोवविती। एक ते चक्रें भेदून जा म्हणती। एक तिमिर दाविती। नेत्रापुढें जें चळतसे ।।५३।। एक ते नासिकीं लक्ष लावविती। एक नेत्र विकासोनि पाहा म्हणती। एक ते नेत्र झांकविती। अंतरींच पाहा म्हणोनि ।।५४।। एक ते यज्ञ होम करविती। स्वर्गीं अमृतपान करा म्हणती। इंद्रपद आणि रंभेची दाविती। लोलुपता ।।५५।। एक ते आकाशीं चालविती। एक जळासनीं बैसविती। अमृतपान करविती। अर्धचंद्रां पैं जाऊनिया ।।५६।। एक तो लिंगदेह साधवी। देवतांतरातें भेटवी। परि ते आघवीच गोवी। दुःखदायक साधनें ।।५७।। परि एका आत्मज्ञानावांचून। तें सर्वहि अकारण। जंव नव्हे एक चैतन्यघन। तंव सर्व साधनें व्यर्थ तीं ।।५८।। ऐसीं नाना साधनें साधविती। ते गुरु परि सद्गुरु न होती। जे स्वयें परब्रह्म करिती। ते सद्गुरु जाणावें ।।५९।। ऐसिया सद्गुरूसीं जावे शरण। दीक्षा घ्यावी सद्भाव धरोन। नित्य तीर्थप्रसादी सेवन। करावे क्रियामार्गें ।।६०।। तीर्थ ऐसा शब्द पडतां कानीं। न पाचारितां जावे लोटांगणीं। किंकरवृत्तीनें

शरण चरणीं। लहान थोर कीजें सर्वां।।६१।। मग स्वामीसीं शरण रिघीजें। तीर्थां आज्ञा घेईजे। मंत्र युक्तीनें सेविजें। विश्वास धरोनि।।६२।। ऐसा तीर्थप्रसादी जो शिवगण। स्वभावें होय तयाचें दर्शन। त्याचा भवबंध होय छेदन। पुण्यपावन होय तो।।६३।। ऐसा जो सत्यशरण। केवळ शिवचि आपण। तो अनंत ब्रह्मांडें व्यापून। अलिप्त असे।।६४।। तया त्रिभुवनींचें राज्य देतां। थुंकोन सांडी सर्वथा। इंद्रपदासीं हाणी लाथा। मा राज्याची आवडी धरील काय।।६५।। तो समूळ क्रियेसीं अकर्ता। निष्कामबुद्धि निरहंता। अष्ट महासिद्धि पायां लागतां। श्लाघ्यता न घे।।६६।। अमृतपान करीत असतां। कांजी अपेक्षा न करी सर्वथा। तेविं वस्तुसुख भोगीतां। इंद्रपदादिक इच्छील काय।।६७।। म्हणोनि निराश निर्वासना। निःसंग आणि निष्कामना। निर्गुण अतीत त्रिगुणा। शुद्ध सत्त्वात्मक तो।।६८।। निर्द्वंद्व निजानंद। भेद नाहीं ऐक्यबोध। जें जें दिसें तें तें सच्चिदानंद। आन पदार्थ दिसे ना भासे ।।६९।। तो सदाशिव सर्व पाहे। परि पाहतां हेतु न राहे। अनायासें होवोनि राहे। सर्वज्ञ ते।।७०।। मी सर्वज्ञ ऐसा। आठवु न होय तया स्वयंप्रकाशां। आठव न आठव दोहींच्या विलासां। साक्षी तो जाहला।।७१।। साक्ष जरी म्हणावा। तरी कांहीं पदार्थ असावा। मग साक्षी व्हावा। पदार्थाचा।।७२।। जरी पदार्थचि नाहीं। मा साक्षित्व मिरवील कांहीं। यालागीं कांहीं न होवोनि पाही। पाहता पाहणारा तो।।७३।। तोचि परब्रह्ममूर्ति।

शुद्ध जंगम बोलिजें तयाप्रति। तयाचें दर्शनमात्रें मुक्ति। ओळंगती वो देवी ।।७४।। मुक्ति दास्य करिती हें नवल काय। तो कृपादृष्टीनें जरी पाहे। तरी आपुले देत आहे। स्वस्वरूप जें ।।७५।। तो सद्भावाचा भोक्ता। सद्भावें शरण जातां। जन्मजन्मांतरीची व्यथा। सकळ हरितु असे ।।७६।। ते कृपेचे सागर। त्यांची कृपा आम्हां निरंतर। ओळंगो त्याचें चरण सादर। स्वहितालागीं ।।७७।। स्वहित जरी म्हणती कोण। तरी तयाचेनि शिवपण। मज शिव म्हणावया कारण। त्याचिया संयोगें ।।७८।। ऐसे ते जे महामहंत। पुजितसे मी निभ्रांत। ते मजलागीं दैवत। मी भक्त तयांचा ।।७९।। विचारितां मी तोचि जाण। बाहीर वेषाचें पालटण। ज्ञानिये जाणती खूण। भेदातें सांडोनिया ।।८०।। शिव म्हणे गिरिजेसीं। तूं माझें स्वरूप अससी। शरीरभावें भेदासीं। रूप जाहलें वो देवी ।।८१।। एकचि बहुरूपिया आपण। बहु रूपें आला घेवोन। परि तो बहुरूपियाचि आन। नाहीं दुसरा ।।८२।। तैसाचि मी आपण। अनंत रूपें नटलो जाण। परि रूपां अरूपां साक्षी होवोन। निराळाचि असे कीं ।।८३।। निराळा परि मी जाण। जाणतु असे आपण। जाणपणालागून। जाणता तो मी ।।८४।। ऐसा जो मी मजलागीं। भेटी घेणें आहे निजांगीं। तरी या ग्रंथालागीं। विसंबू नये ।।८५।। ऐसें पार्वतीनें ऐकोनि वचन। तद्रूप झाली आनंदघन। मनीं तन्मय होऊन। तटस्थ ठेली ।।८६।। मग येवोनि देहावरी। उठोनि साष्टांग नमस्कार करी। म्हणे

मज भेटविले त्रिपुरारी। स्वामिनाथा करूणानिधे ।।८७।। महापुरीं वाहात जातां। अवचित कृपाळु काढी दाता। तैसें तुम्ही स्वामी समर्था। तारियले मातें ।।८८।। चरणां लागे वेळोवेळां। धन्य धन्य स्वामी जाश्वनिळा। बरवें निरोपिलें प्रांजळा। माझिये आवडीसारिखे ।।८९।। हा परमरहस्य ग्रंथ जे पाहाती। ते शिवरूप स्वयें होती। ब्रह्मस्वरूप स्वयें पार्वती। निश्चयें जाण ।।९०।। जे शिवाचे शिवभक्त। सदा आचारी दीक्षावंत। जे जाहाले गुरुकरजात। तिहीं हा ग्रंथ परिसावा ।।९१।। भवीसीं श्रवण न करवावा। हा शिवाचारी शिवभक्तीं ऐकावा। ऐकोनि जीवीं धरावा। तैसाचि करावा आचारु ।।९२।। हा ग्रंथ होतां श्रवण। इंद्रियें होती प्रवीण। मार्ग कळती आचरण। आचरावया ।।९३।। आतां असो कथन फार। परमरहस्य ग्रंथ विस्तार। पार्वतीप्रति ईश्वर। वारंवार सांगतसे ।।९४।। त्याचें सार या ग्रंथाचे ठायीं। वर्णिलें असे सतराध्यायीं। अज्ञ जनां आचाराविषयीं। आरसा जाण पाहावया ।।९५।। हा ग्रंथ तरी ईश्वरमुखीचा। ईश्वर तोचि नागेश साचा। भिन्न भेद म्हणतां वाचा। दुखंड होय ।।९६।। तोचि तो अवतरोन। नागेश नामाभिधान। मिरवे एवढीयानें म्हणून। भेद जाहला काई ।।९७।। जैसें सुवर्ण सोनेपणें। क्षणभरी मिरवलें गेटाभिधानें। तरी वाळिजें काय सोनेपणें। नोहे म्हणोनिया ।।९८।। यालागीं शिव तोचि नागेश्वरु। तोचि बसवराज श्रीगुरु। माणूरपट्टसिंहासनाधिकारु। असे जयासीं ।।९९।। त्याचिया

कृपेंकरून। परमरहस्याची टीका विस्तारून। करविते जाहले आपण। श्रीबसवराज स्वामी ।।१००।। मन्मथशिवलिंग म्हणे। मज वदविले स्वामीनें। पावा वाजवितां तयातें ऐकून। वाजविता तो निराळा ।।१०१।। सूत्रधारियाचें बाहुले। तें चालें नाचें हालें सूत्रधारियाचेनि बोले। सूत्रधारी खेळें ज्या ज्या कळें। तें तें कळें खेळतुसे ।।१०२।। म्हणोनि सूत्रधारी गुरुगोसावी। टीका करविली बाहुलीकरवी। येथें मज मीपणाची पदवी। नुरेचि सर्वथा ।।१०३।। यालागीं ग्रंथकर्ता श्रीगुरुनाथ। तोचि वदला ग्रंथार्थ। शिवगणीं परिसावा प्रीत्यर्थ। म्हणे मन्मथ कर जोडोनि ।।१०४।। हा असे प्रसादी ग्रंथ जाण। याचें करी जो नित्य पारायण। तयाची भवव्याधि चुके मरण। अमर होय सत्य पैं ।।१०५।। ज्याचा लिंगीं नाहीं विश्वास। जे अन्य धर्माचे बनले दास। त्याचा स्पर्श न करावा ग्रंथास। अधर्मी जाण म्हणोनि ।।१०६।। जे विश्वासें भावें वाचिती। ते संसारसुख भोगोनि अंतीं। पावती सायुज्यमुक्ति। धन्य नर तेंचि पैं ।।१०७।। जे दुर्जन निंदक खळ। तया नावडे ग्रंथ रसाळ। रंभाफल त्यागूनि अर्की फळ। आवडी जाण वेचीतसे ।।१०८।। कीं दुग्ध सांडोनिया जाण। प्राशी मद्यातें जाऊन। कीं दुर्दैवी नेत्र बांधून। द्रव्यघटां ओलांडी ।।१०९।। विश्वासें जे श्रवण करिती। तयाच्या सर्व व्याधि नासती। पठण करितां धनाढ्य होती। कीर्ति वाढे अपार ।।११०।। पुत्र-इच्छा धरोनि मनीं। तत्पर होती पारायणीं। तयाचा वंशविस्तार

सुलक्षणी। होय जाण शिवकृपें।।१११।। हा परमरहस्य ग्रंथ परिकर। वीरशैवधर्माचें बीजांकुर। भावें करितां रक्षण साचार। रक्षी शंकर तयातें।।११२।। श्रोते शिवगण समस्त। तया विनवी किंकर मन्मथ। ग्रंथसमाप्तीस आज्ञा घेत। चित्तीं सद्गद होऊनिया।।११३।। कपिलाधार पुण्यधाम। तेथेंचि जालो मी पूर्णकाम। टीका केली सुगम। परमरहस्याची।।११४।। शके पंधराशें बावीस। विक्रमनाम संवत्सरास। वद्य त्रयोदशी माघ मास। ग्रंथ पूर्ण झालासे।।११५।। इति श्रीपरमरहस्यसारामृत। शिवगौरी-संवादीं वर्तत। त्याची टीका करोनि प्राकृत। कृतकृत्य मन्मथ।।११६।।

।। इति श्रीपरमरहस्ये हरगौरीसंवादे सर्वाचारविधिनिरूपणं नाम सप्तदशोऽध्यायः समाप्तः ।।

श्लोक ६, ओव्या ११६.



**एकूण श्लोकसंख्या ३२९ । एकूण ओवीसंख्या २१७३**

## प्रसाद

जे शब्दसृष्टीचे ईश्वर । सबराभरीत अगोचर । निर्लेप मंगल साचार । परमवंद्य जे ॥१॥
नमू तया परमेश्वरा । जगद्रूपा जगदाधारा । जगन्निर्मात्या महेश्वरा । सच्चिद्रूपा जी ॥२॥
जी मी वाग्यज्ञ आरंभिला । तो हा तुम्ही पूर्ण केला । कृपा करोनी पाहिजे दिधला । आशीर्वाद हा ॥३॥
जे दुष्ट दुर्जन अमंगळ । त्यांचे हृदये होवोत निर्मळ । कळीकाळ सकळ । निरसोनी जाय ॥४॥
जे जे दिसे दृष्टीपुढे । ते अवघे शिवरूप गाढे । ऐसिया संतांची हुडे । निर्भय हिंडो ॥५॥
सर्व सुखांचा हो सुकाळ । दुःख दारिद्र्य छळ । नष्ट हो सकळ । मनोमालिन्यही ॥६॥
जे का शिवभक्त जन । त्यांच्या दर्शने पावन । सकळ सृष्टीचे जीवन । होतु आनंदे ॥७॥
या माझ्या जगती तळी । सर्वत्र संचरो भक्तमंडळी । शिवभक्तीची नव्हाळी । नित्य लाभो जगा ॥८॥
जेजे अमंगळ या भुवनी । ते ते लोपो शूळपाणी । सुमंगळ भाव या जनी । उपजो सदा ॥९॥
वाढो लोकी सदाचार । सद्विद्येचा भडिमार । होओ सर्वत्र साचार । हाचि प्रसाद आवडे ॥१०॥
आणिकही ऐसे करावे । सुखाचे मळे पिकवावे । आमूलाग्र नासून जावे । विघ्नबाधा ॥११॥
ही माझी वाक्पुष्पपूजा । समर्पण हो श्रीगुरुराजा । मन्मथशिवलिंग विनवी ओजा । श्रीगुरु नागेशासी ॥१२॥



## श्रीविश्वाराध्यांची आरती

श्रीविश्वाराध्याय मंगलम् । शिव विश्वैकपालाय मंगलम् । विश्वेशजाताय विश्वादिबीजाय । श्रीविश्ववंद्याय मंगलम् ।।धृ.।।

चरवृंदवंद्याय मंगलम् । वरचरनीतिबोधाय मंगलम् । गुरुरूपधाराय गुरुराजिराजाय । परिपूतदेहाय मंगलम् ।।१।।

भवमूलभंगाय मंगलम् । शिव शिवलिंगसंगाय मंगलम् । भवमंगलांगाय शिवपिंग चूडाय । कवितुंगसेव्याय मंगलम् ।।२।।

काशीपुरेशाय मंगलम् । कवि काशीनाथेशाय मंगलम् । क्लेशापहाराय पाशप्रमोचाय । श्रीशादि मान्याय मंगलम् ।।३।।



## श्रीमन्मथस्वामींची आरती

आरती शिवराजा । मन्मथस्वामी महाराजा । वेदान्ताचे सार, मुख्य पेरिले बीज ।।धृ.।।

समाधि महास्थळी, सर्पव्याघ्रांची जाळी । निर्वैर श्वापदे हो, समदृष्टीने न्याहाळी ।।१।।

शिवभक्ति लोप झाली, विश्व शिवमय केले । ग्रंथ हा परमरहस्य, गुह्य प्रकट केले ।।२।।

अभंगी निरूपण, अनुभविले ज्ञान । आनंद शिवदासा, सर्व शुभकल्याण ।।३।।

# निवेदन

परमपूज्य श्रीकाशीज्ञानसिंहासनाधीश्वर **श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी** यांच्या दिव्य नेतृत्त्वाखाली 'श्रीकाशीजगद्गुरू विश्वाराध्य वीरशैव विद्यापीठ, जंगमवाडी मठ, वाराणसी यांच्या वतीने वीरशैव धर्माचा इतिहास, साहित्य व तत्त्वज्ञान यासंबंधी धर्मतत्त्वजिज्ञासूंसाठी तसेच शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी तीन परीक्षा आयोजीत केल्या असून पहिली 'वीरशैव सिध्दान्त प्रबोध परीक्षा' १९९७ पासून घेतली जात आहे. या परीक्षेला महाराष्ट्रातून उत्तम प्रतिसाद लाभला आहे.

**उद्देश**

वीरशैवधर्म अत्यंत प्राचीन आहे. वीरशैवधर्माचा व संस्कृतीचा ठसा प्राचीन काळापासून भारतातल्या विविध भागांतील लोकांवर उमटलेला आहे. याची प्रचिती इतिहास, ताडपत्रे, ताम्रपट व शिलालेखावरून येते. संस्कृत, कन्नड, मराठी, इंग्रजी इत्यादी भाषांतून विद्वानांनी, शिवशरणांनी व संतांनी आपल्या ग्रंथातून व साहित्यकृतीतून वीरशैव धर्मतत्त्वे निरूपीली आहेत. वीरशैवधर्म अत्यंत उदार, व्यापक व सर्वसमावेशक स्वरूपाचा आहे. अशा तत्त्वज्ञानाचा, ग्रंथकार व त्यांच्या ग्रंथांचा, शिवशरण व संत यांच्या जीवनाचा तसेच त्यांच्या साहित्यकृतींचा जिज्ञासूंना व विद्यार्थ्यांना सुलभ व योग्य पध्दतीने अभ्यास करता यावा व त्यांचे यथोचित उद्‌बोधन व्हावे हाच परीक्षा आयोजित करण्यासंबंधीचा उद्देश आहे.

**परीक्षा**

एकूण तीन परीक्षा आयोजित केल्या आहेत.

१. वीरशैव सिध्दान्त प्रबोध परीक्षा

२. वीरशैव सिध्दान्त प्रवीण परीक्षा

३. वीरशैव सिध्दान्त पंण्डित परीक्षा

**'वीरशैव सिध्दान्त प्रबोध परीक्षे'** ची तीन पाठ्यपुस्तके अतिशय सुबोध व सुगम अशा भाषेत मुद्रीत केलेली आहेत. 'वीरशैवधर्माचा स्थूल इतिहास' आणि 'अष्टावरण' या पुस्तकातील प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी प्रश्नावली दिली आहे. प्रश्नावलीवरून विद्यार्थ्यांना अभ्यासाची दिशा समजेल.

**''वीरशैव संतवाणी''** या पाठ्यपुस्तकातील पहिल्या भागात अल्लमप्रभू, सिध्देश्वर, बसवेश्वर, अक्कमहादेवी, चन्नबसवेश्वर यांची प्रत्येक पाच वचने समाविष्ट केली आहेत. प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या भागात मन्मथस्वामी, लिंगेश्वर, बसवलिंग, लक्ष्मण, शिवदास या संतांचे प्रत्येकी पाच अभंग समाविष्ट केले आहेत. मराठीभाषक विदयार्थ्यांच्या दृष्टीने सर्व वचने देवनागरि लिपीत मुद्रित केली आहेत. प्रत्येक वचनातील शब्दांचे अर्थ मराठीत दिले आहेत. शब्दार्थानंतर प्रत्येक वचनाचा भावार्थ मराठीत दिला आहे. भावार्थानंतर टिप दिलेली आहे. टीपांत काही संदर्भ आणि अभंगातील मध्यवर्ती कल्पना व अभंगाची वैशिष्ट्ये स्पष्ट केली आहेत. प्रत्येक अभंगकाराच्या अभंगांनंतर प्रश्नावली दिली आहे.

प्रत्येक पाठ्यपुस्तकाच्या शेवटी विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शनासाठी नमुना प्रश्नपत्रिका दिली आहे. त्यावरून विद्यार्थ्यांना प्रश्नाचे स्वरूप, प्रश्ननिहाय गुणविभागणी यांची स्पष्ट कल्पना येईल.

पंडित परीक्षेसाठी वीरशैव अभ्यासकांनी पी.एच.डी. साठी लिहीलेल्या आणि शैवभारती शोध प्रतिष्ठानने प्रकाशित केलेल्या शोध प्रबंधांचा समावेश केलेला आहे.

## शैवभारती शोधप्रतिष्ठान जंगमवाडीमठ, वाराणसी प्रकाशने

| | | |
|---|---|---|
| १. लिङ्गधारणचन्द्रिका (संस्कृत-मराठी) | - नन्दिकेश्वर शिवाचार्य | १२५.०० |
| २. ब्रह्मसूत्रश्रीकण्ठभाष्यम् (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५०.०० |
| ३. वीरशैव अष्टावरण विज्ञान (संस्कृत-मराठी) | - डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी | ५०.०० |
| ४. सिध्दान्तशिखामणिसमीक्षा (संस्कृत) | - डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी | २००.०० |
| ५. निगमागम संस्कृति (संस्कृत-हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५०.०० |
| ६. सूक्ष्मागमः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १२५.०० |
| ७. चन्द्रज्ञानागमः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १७५.०० |
| ८. मकुटागमः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १००.०० |
| ९. कारणागमः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं.रामचंद्र पाण्डेय | १५०.०० |
| १०. निगमागमीयसंस्कृतिदर्शनम् (संस्कृत-हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २००.०० |
| ११. पारमेश्वरागमः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २००.०० |
| १२.Chandrajnanagam (Sanskrit-English) | - Tr. by Dr. Rama Ghose | 300.00 |
| १३. ईशावास्योपनिषद् (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. जगन्नाथ शास्त्री तैलङ्ग | १००.०० |

| | | |
|---|---|---|
| १४. केनोपनिषद् (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. जगन्नाथ शास्त्री तैलङ्ग | १५०.०० |
| १५. सिध्दान्तप्रकाशिका (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ७५.०० |
| १६. Makutagama | - Tr. by Dr. Rama Ghose | 150.00 |
| १७. शक्तिविशिष्टाद्वैततत्त्वत्रयविमर्शः (संस्कृत) | - डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी | २००.०० |
| १८. अनुभवसूत्रम् (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा पं. जगन्नाथ शास्त्री मुसलगाँवकर | १२५.०० |
| १९. सिध्दान्तशिखोपनिषद् (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. जगन्नाथ शास्त्री तैलङ्ग | २५०.०० |
| २०. ब्रह्मसूत्रशाङ्करीवृत्तिः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. केदारनाथ त्रिपाठी | १५०.०० |
| २१. सिध्दान्तसारावलिः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ४००.०० |
| २२. श्री गुरूगीता (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १२५.०० |
| २३. शिवाद्वैतदर्पणः (संस्कृत-हिन्दी) | - शिवानुभव शिवाचार्य | १००.०० |
| २४. सिध्दान्तशिखामणी मीमांसा (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २५०.०० |
| २५. देवीकालोत्तरागमः (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १००.०० |
| २६. Paramesvaragama | - Tr. by Dr. Rama Ghose | 550.00 |
| २७. संस्कृत वाङ्मय मे वीरशैव साहित्य (संस्कृत-हिन्दी) | - एस. अक्कूरमठ (सम्पा. पं. प्रभुनाथ द्विवेदी) | १५०.०० |

| | | |
|---|---|---|
| २८. **ऋग्वेदस्यप्रथममण्डलस्य सयणवेंकटमाधव - भाष्ययोस्तुलनात्मकमध्ययनम्** (संस्कृत-हिन्दी) | - डॉ. प्रमोदिनी पण्डा | ४००.०० |
| २९. **तन्त्रागमीय धर्म-दर्शन (२ भाग)** (संस्कृत-हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ९००.०० |
| ३०. **साम्ययोगमीमांसा** (संस्कृत-हिन्दी) | - मुकुट बिहारी लाल | ३००.०० |
| ३१. **भारतीय संस्कृति का समग्र स्वरूप** (हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ३००.०० |
| ३२. **संस्कृत वाङ्मय वल्लरी** (संस्कृत-हिन्दी) | - डॉ. गंगाधर पण्डा एवं डॉ. प्रमोदिनी पण्डा | ३००.०० |
| ३३. **मुण्डकोपनिषद्** (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा. पं. जगन्नाथ शास्त्री तैलङ्ग | ४५०.०० |
| ३४. **वातुलशुध्दाख्यतन्त्रम्** (संस्कृत-हिन्दी) | - सम्पा पं. व्रजवल्लभ द्विवेदी | २००.०० |
| ३५. **Transmigration** (जन्मान्तरवादः) (इंग्लीश) | - पं. केदारनाथ त्रिपाठी | १५०.०० |
| ३६. **सांस्कृतिक राष्ट्रवाद** (हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ३००.०० |
| ३७. **पारमेश्वरागम** (तेलगू) | - डॉ. के. प्रताप | ६००.०० |
| ३८. **पंचविंशतिलीलाशतकम्** (संस्कृत-हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | ३००.०० |
| ३९. **Siddhanta Prakasika** (English) | - Translated by T. Ganeshan | 150.00 |
| ४०. **पंचवर्णसूत्रमहाभाष्यम्** (संस्कृत-हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५०.०० |

| | | |
|---|---|---|
| ४१. तन्त्रागम सार-सर्वस्व (हिन्दी) | - पं. व्रजवल्लभ द्विवेदी | १५०.०० |
| ४२. श्वेताश्वतरोपनिषद् (संस्कृत-हिन्दी) | - पं. जगन्नाथ शास्त्री तैलङ्ग | ३००.०० |
| ४३. सिध्दान्तशिखामणि ( हिन्दी-व्याख्या) | - पं. राधेश्याम चतुर्वेदी | ४५०.०० |
| ४४. जन्म हा अखेरचा (मराठी ग्रंथ) | - डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी | ३५०.०० |
| ४५. वीरशैव संतकवी बसवलिंग : चरित्र व वाङ्मय (मराठी) | - डॉ. चंद्रशेखर कपाळे | १५०.०० |
| ४६. लक्ष्मण महाराज : व्यक्ति आणि वाङ्मय (मराठी) | - डॉ. भी. शी. स्वामी | १५०.०० |
| ४७. श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य (मराठी) | - डॉ. शे.दे. पसारकर | २००.०० |
| ४८. वीरशैवांचे मराठी-हिन्दी वाङ्मय : एक अभ्यास (मराठी) | - डॉ. श्यामा घोणसे | १००.०० |
| ४९. मन्मथस्वामी : व्यक्ती वाङ्मय (मराठी) | - चंद्रकांत देऊळगांवकर | ७५.०० |
| ५०. वीरशैव मराठी अभंगकविता : एक चिकित्सक अभ्यास (मराठी) | - डॉ. शोभा कराळे | १००.०० |
| ५१. मराठी काव्यातील शिवदैवत - दर्शन (मराठी) | - शिवशंकर उपासे | १२५.०० |
| ५२. विदर्भातील वीरशैव संप्रदाय : ग्रंथकार व वाङ्मय (मराठी) | - अशोक मेनकुदळे | १००.०० |
| ५३. वीरशैव संतकवी शिवदास : एक अभ्यास (मराठी) | - डॉ. वैजनाथ फास्के | १५०.०० |
| ५४. सिध्दान्तशिखामणी (इंग्लीश) | - डॉ. एम. शिवकुमार स्वामी | १४००.०० |

| | | |
|---|---|---|
| ५५. वीरशैव पंचपीठे (मराठी) | - डॉ. चंद्रशेखर कपाळे | ३०.०० |
| ५६. वीरशैव संतवाणी (मराठी) | - पं. शिवाप्पा खके | ३०.०० |
| ५७. अष्टावरण (मराठी) | - डॉ. शे.दे. पसारकर | ३०.०० |
| ५८. वीरशैवधर्माचा स्थूल इतिहास (मराठी) | - डॉ. चंद्रशेखर कपाळे | २०.०० |
| ५९. पंचाचार (मराठी) | - पं. शिवाप्पा खके | ३०.०० |
| ६०. वीरशैवांची स्फुट कविता (मराठी) | - शांतितीर्थ स्वामी | ३०.०० |
| ६१. मन्मथचरितामृत (मराठी) | - डॉ. शे.दे. पसारकर | २०.०० |
| ६२. संक्षिप्त शिवपूजाविधी (मराठी) | - डॉ. काशीजगद्गुरू महास्वामीजी | १५.०० |
| ६३. शिवपाठ (मराठी) | - डॉ. काशीजगद्गुरू महास्वामीजी | ५.०० |
| ६४. वीरशैवरत्न (मराठी) | - पं. काशीनाथशास्त्री | ५०.०० |
| ६५. सिध्दान्तशिखामणि प्रवचनप्रभे (कन्नड) | - डॉ. काशीजगद्गुरू महास्वामीजी | ५००.०० |
| ६६. श्री सिध्दान्तशिखामणि तत्त्वामृत (पारायण ग्रंथ, ओवीबध्द मराठी) | - डॉ. शे.दे. पसारकर | २००.०० |
| ६७. श्री सिध्दान्तशिखामणि (रशियन भाषेत) | - कु. यूलिया (गौरी) क्रावचेन्को | ५००.०० |
| ६८. परमरहस्य (मराठी) | - संतशिरोमणी श्रीमन्मथस्वामी | १००.०० |

ग्रंथ मिळण्याचे ठिकाण

## शैवभारती शोधप्रतिष्ठानम्

जंगमवाडी मठ, वाराणसी, फोन : (०५४२) २४५०५४६

---

श्रीमद् जगद्गुरू पंचाचार्य यांचे सेवक

## श्रीधर श्रीराम पैलवान

१७०४, सोमवार पेठ, भवानी गल्ली, तासगांव

जि. सांगली, चरभाष : ९५२७८०६७५०, ९०२८२३५१३५, ९३७२१४८०९६

---

## श्रीमद् जगद्गुरू पंचाचार्य बुक स्टॉल व कॅसेट सेंटर अँड नॉवेल्टी

शाहिर वस्ती, प्लॉट नं. ५५/४०, भवानीपेठ, सिध्देश्वर बालक मंदिर जवळ, सोलापुर

फोन : (०२१७) २७२७२२१, मोबाईल : ०९९६०२२२१५१, ९४२१०३३७०६, ९४०४३०४२२१